# जादू मंत्र व तंत्र




शिका व मनरंजनाबरोबरच पैसेही कमवा.

# जादू मंत्र व तंत्र



: लेखक :

जादूगार चंद्रसेन

मूल्य :

एक रुपाया

*पाहतां पाहतां रूमालाचे अंडे करण्यापासून सिलबंद पोत्यांतून क्षणांत माणसाची अदलाबदल करणें शिकवणारे पू. गुरूजी जादूगार रघुवीर यांचे मार्गदर्शन पुस्तकास लाभले आहे.*

## अर्पण पत्रिका

" जादूचे प्रयोग शिकवा ना बाबा ! "
असा हट्ट करणाऱ्या लाडक्या
चि. किरण यास अर्पण.

— जादूगार चंद्रसेन



विजेच्या यंत्रावर चालणाऱ्या करवतीनें उघड्या टेबलावर प्रथम लाकूड कापून दाखविणें व नंतर लाकडाचे जागेवर तरुणीस आडवी झोपवून यांत्रिक करवत तरुणीच्या पोटांतून आरपार जातांना आपले डोळे दिपतील.

लेडीज कटिंग

या टेबलावर लाकूड आडवे ठेवून बटन दाबताच यंत्राचे साहाय्यानें चालणारी करवत येऊन लाकूड कापून जाते. नंतर त्याच लाकडाचे जागेवर जादूगार झोपून स्वतःचे हात व पाय प्रेक्षकांकडून बांधून घेवून बटन चालू करण्यांत येते. पुढील प्रसंग पहाण्यासाठी जादूगार चंद्रसेन यांचा भव्य कार्यक्रम ठरवून ३ तास जादूनगरीचा प्रवास करा.



मृत्यूशी झुंज

# प्र स्ता व ना

सर्कशींत सर्वांत हुषार विदुषकाला समजतात. कारण त्याला सर्व कामे उत्कृष्टपणे यावी लागतात. सर्कशीची मदार कांहीं प्रमाणात विदुषकावर असते असे म्हणतात ते खोटे नाहीं.

आणि आश्चर्य म्हणजे सदर पुस्तकाचे लेखक श्री. चंद्रसेन हे माझ्या पार्टींत प्रथम विदुषक म्हणूनच आले त्यांनी आपले स्वतःचे काम चोख केलेच पण मला माझ्या इतर प्रयोगांतहि खूप मदत केली. त्यावेळी ते माझ्या पार्टींचे आधारस्तंभ होते. त्यांची ही कृति कष्टसाध्य आहे. प्रत्येक प्रयोगावर त्यांनी विचार केलेला आहे.

श्री. चंद्रसेन यांचे पहिले पुस्तक लोकांना इतके आवडले कीं, थोड्या आवधीतच त्याच्या २ आवृत्त्या संपल्या. श्री. चंद्रसेन ह्यांचे हें नवे पुस्तकहि वाचकांना निश्चितपणें आवडेल. नोट जाळून पुन्हा तयार करणे, मागाल तो पदार्थ निर्माण करणे वगैरे गाजलेले प्रयोग ह्या पुस्तकांत आहेत.

श्री. चंद्रसेन हें कष्टाळू गृहस्थ आहेत. त्यांच्या हातून अशी बरीच पुस्तके लिहून जादू क्षेत्रांत पुस्तकांची जी उणीव आहे ती भरून निघावी असे मला मनापासून वाटते.

—जादूगार रघुवीर

प्रयोगानुक्रम



---

[ कृपया पान नं. २४ वरील दुसरी आकृती नजर चुकीनें उलटी पडली आहे तरी वाचतांना ती सुलटी धरून पाहावें. क्षमस्व. ]

# प्रास्ताविक

**जादूची किमया**—आवृत्ति पहिली व दुसरी अवघ्या तीन महिन्यांत संपली व अनेक अभ्यासू विद्यार्थ्यांकडून अद्यापही मागणी येतच असल्याने या छोटया पुस्तकाचा खप व वाचकांचे आकर्षण पाहून हे पुस्तक लिहिण्याचा मोह आवरता आला नाही व या मोहातूनच हे पुस्तक नुकतेच लिहून झाले. अद्याप ते छापण्यासाठी छापखान्यात द्यायचे आहे. परंतु पुस्तक तयार झाले आसल्यास पोस्ट खर्चासह किंमत कळविणे. व्ही. पी. ने पाठवून देणे वगैरे स्वरुपाची पत्रेही बरीच आलेली आहेत किंबहुना हीं पत्रे अधून मधून येत होती. म्हणूनच हे पुस्तक लिहून तयार झाले असे म्हटले तरी वावगे होणार नाही असे वाटते. या पुस्तकामध्ये हातचलाखीचे प्रयोग, नाण्यांचे प्रयोग तसेच पत्त्यांचे प्रयोग, रुमालांचे प्रयोग सर्वसाधारणपणे ज्या वस्तू घरोघरी असतातच आशाच वस्तूंचा या प्रयोगामध्ये समावेश केलेला आहे. कारण नवशिक्या विद्यार्थ्यांना प्रयोगासाठी लागणारे साहित्य तयार करणे अथवा करून घेणे या गोष्टी लगेच जमत नसतात ही गोष्ट पुस्तक लिहिताना प्रामुख्याने डोळ्यासमोर होतीच. या पुस्तकामध्ये लिहिलेले प्रयोग करायला जितके सोपे तितकेच ते आश्चर्यचकित करणारेहि आहेत. हे प्रयोग करून दाखविणारा थोडासा धाडसी व चतुर असेल तर तो कितीही मोठ्या समाजात टाळ्याच घेईल.

या पुस्तकापासून मिळणारा दुसरा फायदा म्हणजे एक गूढ समजून घेणे हा होय. जादू या शब्दाला मूळ इंग्रजी भाषेत मॅजिक

असे म्हणतात. जादू म्हणजे नजरबंदी व नजरबंदी म्हणजे जादू असे समीकरण होते. नजरबंदी म्हणा किंवा जादू म्हणा पण जादू म्हणजे दैवी शक्तीने होणारा अद्‌भूत चमत्कार असाच कांहीं लोकांचा अद्यापहि समज आहे. किंवा पाणी शिंपडून तोंडाने कांही मंत्रोपचार कांही निखालस कृत्य करणे हीच जादू असेही म्हटले जाते. मनुष्याचे पक्षी करणे, त्यांना पकडून पिंजऱ्यात ठेवणे. इकडचा राजवाडा तिकडे नेऊन ठेवणे, राजाला फकीर करणे, मासे करणे इत्यादि अद्‌भुत गोष्टींचा जादू या शब्दामध्ये समावेश होतो. अशा तऱ्हेची जादूची विद्या आज जगात आहे. किंवा नाही, असलीच तर ती सत्य की असत्य याचा ऊहापोह करण्याच्या मीं मुळीच भरीस पडत नाही. या संबंधाने मी एवढेच सांगू इच्छितो की, अशा प्रकारची जादू आज कोठेच अस्तित्वात असलेली दृष्टीस पडत नाही. हातचलाखीचे प्रयोग, साहित्याच्या साह्याने केले जाणारे प्रयोग, रासायनिक प्रयोग इत्यादीकापासून केले जाणारे प्रयोग यालाच जादू असे म्हणण्याचा परीपाठ पडलेला आहे.

जगाच्या उत्पत्तीबरोबरच प्रथम अज्ञान जन्माला आले तेच प्राणीमात्रांत भरून राहिलेले आहे. त्यानंतर किती तरीं वर्षांने मागाहून ज्ञानाचा उदय झाला त्यामुळेच ज्ञानाचे प्रमाण फार थोडे त्याहून अज्ञानाचे प्रमाण फारच मोठे हाच नियम सगळीकडे पहावयास मिळतो. हे नाहीसे होण्याचा संभव आज तरी दिसत नाही. ही समाजातली विषमता आहे. ती नाहीशी झाली तर जगाचे अस्तित्व राहाणेच कठीण होईल. अज्ञानाचे जिवावरच ज्ञानीजणांची पोटे भरतात. डॉक्टर तीन घोट औषधाचे देऊन तीन-तीन रुपये घेतात याचे कारण त्याला माहिती असते. व

याला नसते म्हणून. बैल घोडे मरमर मरतात. धन्याच्या भाड्याची खळगी भरीत प्राण सोडतात का ते ? त्यांचे अज्ञान म्हणून कोणी गाय खाटी झाल्यावर कसायालाही विकतो. तीच गाय आपल्या तान्हुचा वासराला बाजूला सारून धन्याला दूध देते हे तिचे अज्ञान म्हणूनच ना ? जर तिला कळते तर एक थेंब तरी धन्याला देते का ? काश्मीर आमचा. बेरुबारी आमचा. आक्साई चीन आमचा. कच्छ आमचा, परकीय त्यावर हक्क सांगतात हे आमचे अज्ञान म्हणूनच. देश आमचा राष्ट्र आमचे राज्य केले इंग्रजांनी हे का तर आमचे अज्ञान. आपल्या देशाचे संरक्षण कसे करावे हे आपल्याला उमगले नाही आणि त्यांना ती हातोटी साधली असा हा ज्ञान अज्ञानाचा खेळ आहे. परंतु ह्याला फसवेगिरी म्हणण्याचे धाडस कोणी करीत नाही. आणि गारुडी जादूगार किमयागार यांना फसवे म्हणतात. एवढाच फरक पण ही फसवेगिरी नसून बुद्धीच्या गफलतीने मनुष्यास भुरळ पाडून भ्रमात टाकण्याची ही एक कला आहे. मग सहाजिकच असा प्रश्न उद्‌भवतो. दैवी शक्तीच्या जोरावर अथवा मांत्रीक सामर्थ्याने जादूचे प्रयोग होत नाहीत मग ही फसवाफसवी पाहीजे कशाला. जे पूर्वीपासून चालत आले त्याचा आणखीन प्रसारच करायचा. पण या कले-पासून आबालावृद्धांची करमणूक होते एवढेच नव्हे तर मोठमोठे विद्वान् धूर्त चाणाक्ष लोकही क्षणभर थक्क होतात. या कलेत कितीतरी गूढ असते. अनेक तर्कवितर्क करूनही त्याचा उलगडा होतच नाही. इतकेच काय पण कांही हातचलाखीच्या साहृयाने केले जाणारे अद्‌भुत चमत्कार पाहून बुद्धीवादी माणसे गुंग होऊन जातात. तेव्हा अशा विषयाची थोड्याप्रमाणांत का होईना, प्रत्ये-कास माहिती असणे आवश्यक आहे असे मला तरी वाटते.

शिवाय ही कला सर्वांना प्रिय आहे. फसवेगिरी असली तरी हस्तकौशल्य आहे. या विद्येच्या शिक्षणापासून कल्पना चातुर्यात भर पडेल. प्रभावी बुद्धीला चालना मिळेल. शिकावू विद्यार्थ्यांना या पुस्तकाचा चांगला लाभ होईल अशी आशा करून ही अल्प प्रस्तावना संपवितो.

जादूगार चंद्रसेन

# जादू मंत्र व तंत्र अर्थात नजरबंद शिक्षक

## पूर्वार्ध

जादू म्हणजे नजरबंद आणि नजरबंद म्हणजे शुद्ध फसवणूक हे तर खरेच आहे. मोठमोठ्या बुद्धीवादी अथवा धूर्त अशा हजारो लोकांच्या डोळ्यांत उघडउघड धुळफेक कशी करावी ह्याचीच ही एक विद्या आहे. ही विद्या हस्तगत केल्यावर अनेक प्रयोग करून दाखविता येतात परंतु हे प्रयोग करून दाखविण्यासाठी लागणारी निरनिराळी साधने तयार करून घेणे. यातच या विद्येची गुरुकिल्ली आहे. ही गुरुकिल्ली सापडल्यावर जादूचे प्रयोग करणे विशेष अवघड नसते. जादू म्हणा किंवा नजरबंदी म्हणा पण ही एक कलाच आहे. नाटक अथवा चित्रपट पहाणे ही जशी करमणूक तसेच जादूचे प्रयोग पहाणे अथवा करणे ही पण एक करमणूकच आहे. नाटक पाहून झाल्यावर जो तो आपल्या आवडीप्रमाणे चांगले अथवा वाईट मत नोंदवून मोकळा होतो. परंतु जादूचे प्रयोग पाहिल्यावर अमूक एक प्रयोग कसा केला असेल याचे विचारचक्र प्रेक्षकांच्या मनांत कांहीदिवस तरी फिरत असते व सहाजिक शोधक बुद्धीला चालना मिळते. रसायन शास्त्राचे खेळ तर ज्ञानवर्धकच असतात. तरी या खेळांत कसलाही लपंडाव नसतो अशातला भाग नाही, पण समजा जरी लपंडाव असला व फसवेगिरी असली तरी तिच्यापासून एक गोष्ट विशेष शिकण्यासारखीं आहे. ती ही की, आपण कितीहि डोळ्यांत तेल घालून बसलो. बारीक नजरेने निरीक्षण केले तरी धूर्त लोक पहाता पहाता प्रेक्षकांच्या डोळ्यांत कशी धुळफेक करतात, आपल्या

हातावर कशा तुरी देतात ह्या गोष्टी लक्षांत घेऊन जगांतील, धूर्त लोकांची, लफग्यांची, भामटयांची, भोदूंची नीट पारख करणे आणि केवळ नकली गोष्टीला भुलून न जाण्याची सावधगिरी ठेवण्याची अंगी पात्रता आणता येणे हा फायदा तरी कांही कमी आहे काय ?

## वक्तृत्व

जादूगाराचे अंगी वक्तृत्वशक्ती असणे आवश्यक असते. हे वक्तृत्व म्हणजे लोकसभेतील अभ्यासात्मक भाषण नव्हे. सभेतील पांडीत्य नव्हे तर सामान्य बोलघेवडेपणा किंवा शुद्ध विनोद नव्हे, निव्वळ बाष्कळपणा म्हटले तरी चालेल. निरुत्तर करणारे उत्तर नसले तरी चालेल परंतु हजर जबबीपणा जादूगाराचे अंगी असणे आवश्यक आहे. त्याशिवाय कितीही हुशार जादूगार असला तरी त्याच्या प्रयोगाला रंग चढणार नाही. हे प्रयोग करणारा जर घुम्या असेल, लाजाळू असेल ज्याच्या तोंडावरची माशीसुद्धा उठत नसेल अशा माकडाच्या हातून जादूचे प्रयोग यशस्वी होणार नाहीत. कारण कोणतीही भाषा घ्या अथवा साधी चर्चा घ्या त्यात विनोद असला तर ते भाषण फार खुलून उठते तेव्हा आपल्या जादूच्या प्रयोगाची वाहवा व्हावी असे वाटत असेल तर त्यात वायफळ बडबडीची लाज घेऊन उपयोग नाही. जादूच्या प्रयोगा-तील सर्वात मुख्य गुरुकिल्ली अशी की, सर्व प्रेक्षकांचे लक्ष एक समयावच्छेदे करून आपल्या उजव्या हाताकडे अथवा डाव्या हाताकडे किंवा दुसऱ्या एखाद्या वस्तूकडे वेधून घ्यायचे आणि उजव्या हाताने आपले गुप्त कारस्थान उरकून घ्यायचे यालाच आपण जादू असे म्हणतो.

## टापटीप

जादूचे प्रयोग करणाराने दुसरी गोष्ट संभाळावयाची म्हणजे कोणतीही गोष्ट वेळच्या वेळी व टापटीपीने करणे. जादूच्या प्रयोगामध्यें या गोष्टीला फार जपावे लागते. फार काय पण दोन मिनिटांचा फरक झाला तर जादूगाराची फजीती झालीच म्हणून समजा. एका डब्याचे झांकण केव्हा उघडायचे, कुठल्या वेळेस जादूची कांडी हातात घ्यायची कोणत्या वेळेस उजव्या खिशातला रुमाल डाव्या खिशात ठेवायचा या सर्व क्रिया अगदी यंत्राप्रमाणे ठरल्यावेळी पण सहजगत्या घडल्या तरच काम बेमालूम होतें. आणि लोकही आश्चर्यचकित होतात. यांत थोडासा जरी फरक पडला तरी लोकांमध्यें शंका निर्माण होते. इतकेच नव्हे तर जादूगाराची गुप्त कृती लोकांच्या नजरेत येऊन प्रयोगाचा विरस होतो. तसे पाहिले तर ह्या गोष्टी अगदी शुल्लक असतात. पण त्याकडे दुर्लक्ष झाले तर प्रयोगातील सर्व मजा निघून जाते व जादूगाराचा कचखावूपणा दिसून येतो.

## प्रेक्षकावर छाप ठेवणे

जादूगाराचे अंगी जे अनेक गुण असावे लागतात त्यापैकी प्रेक्षकांवर छाप ठेवणे हाही गुण आवश्यक समजला जातो. किंबहुना हा गुण सर्व प्रथम साध्य केला पाहिजे याचे कारण जादूचे प्रयोग म्हणजे शुद्ध फसवेगीरी, भामटेगीरी छपवाछपवीचा मायाबाजार हा लपंडाव पूर्वी चांगल्या भावात खपला जात असे पूर्वी कोणते हि प्रगोग केले तरी ते मंत्र सामर्थ्याच केले जातात असा लोकांचा समज असे कारण पूर्वीचे लोक भोळे होते. पण आज परिस्थिति बदलली आहे. आताचे लोक फार धूर्त चाणाक्ष

आहेत. त्यात मुले तर फारच चौकस. अशांचे पुढे जादूचे प्रयोग करून दाखवायचे ते फार सांभाळून करावे लागतात. प्रयोग करीत असतांना जरा कुठे चुक झाली अथवा जादूगाराची गुप्त कृती नजरेत आली की ही मुले मोठ्यांच्या आधीं ओरडून गुप्त कृती सर्व प्रेक्षकांच्या नजरेस आणून जादूगाराची फजीती करतात. यासाठी पुढे पुढे लुडबूड करणाऱ्या लोकांचे प्रथमतः त्यांचेच दात त्यांचेच घशात घालून आपणच त्यांची फजीती करावी अशा रीतीने कांहीं लुडबूड करणाऱ्याची पुंगी बंद केल्यावर बाकीचे लोकहीं थोडेसे कचरतात व आपोआपच त्यांचीहि तोंडे बंद होतात असे कांही प्रयोग पुढे दिले आहेतच. जादूगाराने आपली छाप दुसऱ्यावर बसविणे किंवा त्यांना चकविणे अशा कांही पद्धती कमी जास्त प्रमाणांत या प्रयोगात दाखविल्या आहेतच. त्याचा उपयोग आपापल्या कल्पनेप्रमाणे किंवा प्रसंग पाहून करायचा असतो.

## जादूगाराचा साथीदार

मित्र मंडळीत चार दोन प्रयोग करून दाखवायचे असतील तर त्यासाठी साथीदार नसला तरी चालतो परंतु अनेक प्रयोग करून वहावा मिळवायची असेल तर साथीदार असणे आवश्यक असते. या साथीदाराला विनोदाने हस्तक किंवा हुंडीबाग असे म्हणतात. राजापेक्षा प्रधान अधिक शहाणा असावा लागतो तसेच हा साथीदार उत्तम असेल तर मोठमोठे प्रयोग सहजगत्या करून दाखविता येतात. हा साथीदार जितका चलाख, चतुर समयसुचक असेल तितके प्रयोगाला अधिका रंग चढतो या साथीदारास जादूचे सर्व प्रयोग अवगत असले पाहिजेत. एवढेच नव्हे तर जादूगारापेक्षा हा कांकणभर सरस असला पाहिजे.

# जादूच्या प्रयोगासाठी आवश्यक साधनसामुग्री

विशिष्ट कार्यासाठी विशिष्ट सोईचे केलेले साधन किंवा आपरेटस् यालाच साहित्य असे म्हणता येईल. कोणत्याहि जादूच्या प्रयोगासाठी तयार केलेले साहित्य हेच मुख्य असते. किंबहुना अशा तऱ्हेचे प्रयोग करणे हे त्या साहित्यावरच अवलंबून असते. जादूच्या प्रयोगासाठीं हातचलाखी ही कितीहि आवश्यक असली तरी साहित्याच्या प्रयोगाशिवाय या कार्यक्रमाला रंग येणे कधीच शक्य नसते. पण ज्याचेकडे हे साहित्य भरपूर उपलब्ध असेल व ज्याला हातचलाखी मुळीच साधत नसेल, ती करण्याची सवय नसेल असा नवखा माणूससुद्धा हे प्रयोग चांगल्याप्रकारे करून वाहवा मिळऊ शकतो. एवढे महत्व जादूचे प्रयोगात या साहित्याला आहे. यासाठी जादूचे प्रयोग करणाराने जेवढा या साहित्याचा संग्रह करता येईल तेवढा करीत जावे. एवढेच नव्हे तर स्वतःचे कल्पना शक्तीने व कल्पकतेने नवीन साहित्य तयार करून नवीन प्रयोग करून दाखविल तरच तो खरा बुद्धीवान जादूगार म्हणावे लागेल. त्याचीच सर्वत्र वाहवा होईल हे सांगणे नकोच जादूच्या प्रयोगांतील चमत्कार करून दाखविण्याची साधने अर्थात साहित्यहि कांही एकाच प्रकारची नसतात. हे साहित्यहि निरनिराळ्या प्रकारचे असते. कांही प्रयोग हातचलाखीच्या साह्याने होतात. कांही प्रयोग साहित्याचे साह्याने होतात वैं कांही प्रयोग रासायनीक द्रव्यानीं होतात. कांही प्रयोग पदार्थाच्या स्वयंसिध धर्मानेही होतात. यांपैकी रासायनीक प्रयोगांना या साहित्याचीं गरज भासत नाही. परंतु जादूचे प्रयोग म्हटले म्हणजे साहित्य हे प्रामुख्याने लागते. हे प्रयोगाला अनुसरून ज्याचे त्याने

तयार करून घ्यावे. एवढे करून झाल्यावर प्रयत्नवादी माणूस धोरणाने हवा तो प्रयोग बिनचूक करून दाखऊ शकतो.

( पूर्वार्ध समाप्त )

## नोट जाळून त्याच नंबरची नोट निर्माण करणे

एक प्रयोग संपवून दुसऱ्या प्रयोगाकडे वळणारा जादूगार आपल्या बोलण्याचा वेग जरा कमी करून प्रेक्षकांतून एखाद्या व्यक्तीस स्टेजवर येण्याची विनंती करतो. प्रेक्षक स्टेजवर येताच जादूगार मोठ्या आदरानें त्याची ओळख करून घेतो व तुमच्या-कडे एक रुपयाची नोट असल्यास कृपया त्या नोटेचा नंबर एखाद्या कोऱ्या कागदावर लिहा असे सांगून आणखी एका प्रेक्षकास स्टेजवर येण्याची विनंती करतो. लगेच जादूगाराला मदत करण्याच्या उद्देशाने आणखी एक प्रेक्षक स्टेजवर येतो तोपर्यंत प्रथम आलेल्या प्रेक्षकाने नोटेचा नंबर लिहून ठेवलेला असतो. आता आपल्या पैकी एकाने नोट हातात धरावी व दुसऱ्याने काडी पेटवून नोट जाळून टाकावी असे बोलून जादूगार काडीपेटी प्रेक्षकास देतो आणि प्रेक्षकहि मागेपुढे न पाहता खरोखरीच नोट जाळून टाकतो. नोट खरोखरीच जाळलेली पाहून प्रेक्षक गोंधळात पडतात. कारण त्याच नंबरची नोट जादूगार कोठून काढणार पण काय चमत्कार समोरच बसलेल्या सद्‌गृस्थाच्या पुस्तकांतू जादूगार त्याच नंबरची नोट काढून ज्यांनी स्वतःची नोट जाळली होती त्यास देतो. जाळलेल्या नोटेचा नंबर लिहून ठेवलेला असतो. त्याच नंबरची ही नोट असल्यामुळे प्रेक्षक एकदम चकित होतात व जादूगाराचे कौतुक करतात.

# कृती

ज्या प्रेक्षकाजवळ एक रुपयाची नवी नोट आहे अशा प्रेक्षकास स्टेजवर येण्याची विनंती करावी आणि प्रेक्षक स्टेजवर आल्यावर मोठ्या आदराने त्याची ओळख करून घ्यावी. व आपल्या जवळची नोट काढून तिचा नंबर एका कागदावर लिहून ठेवा. असे बोलून आपल्या जवळचा कोरा कागद नंबर लिहिण्यासाठीं प्रेक्षकाजवळ द्यावा व नंबर लिहून झाल्यावर तुम्ही लिहिलेला नंबर बिनचूक आहे का ते तपासून पहा असे पुन्हा पुन्हा विचारावे. आता मी एकदा तपासतो असे बोलून नोट जादूगाराने स्वतःच्या हातात घ्यावी व लिहिलेला नंबर प्रेक्षकांस वाचण्यास सांगावे व आपण नंबर तपासित असल्याचा भास निर्माण करावा. व नंबर वाचून होताच त्या नोटेची सरळ उभी एक घडी घालून डाव्या हाताने नोट त्याच्या हातात द्यावी. व उजव्या हातातली मुळ नोट आपल्या खिशात ठेवावी. नंबर तपासण्यासाठी जेव्हां आपण नोट घेतो त्याच्या आधीं उभी घडी घातलेली नोट आपल्या डाव्या हातात धरावी व उजव्या हातात प्रेक्षकांची नोट घ्यावी व परत देताना वर सांगितल्याप्रमाणें नोट परत त्याच्या हातात द्यावी. एवढे करून झाल्यावर दुसऱ्या एका प्रेक्षकास स्टेजवर येण्यास सांगावे. व एका प्रेक्षकाचे हातात नोट देऊन दुसऱ्या प्रेक्षकास काडी ओढण्यास सांगावे. व नोट जाळून होईपर्यंत जादूगारानें आपल्या खिशातील मूळ नंबरची नोट काढून तिची बारीक घडी घाबून उजव्या हाताचा अंगठा व अंगठ्याशेजारील बोट यांच्यामध्ये ती नोट लपवावी व आपल्या सोईस्कर अशा वस्तू-मधून तीच नोट काढून दाखवावी. हा प्रयोग करून दाखविण्याच्या दोन–तीन पद्धतीं आहेत शिकाव् मुलांच्यासाठी मीं ही पद्धत निवडली आहे. तीं करायला सोपी आहे फक्त प्रयोग करणाऱ्याने सराव केले पाहिजे.

# खाऊचा डबा

## रिकाम्या डब्यातून प्रेक्षक मागतील ते पदार्थ निर्माण करणे

### संभाषण

जादूगार हातात जादूची कांडी घेवून प्रेक्षकांस सामोरे जाऊन पुढील प्रयोगाची थोडक्यात रूपरेशा सांगण्यास प्रारंभ करतो आता मी आपणास जो प्रयोग करून दाखविणार आहे. तो प्रयोग फारच गमतीशीर व मजेशीर असा आहे. माझ्याकडे कांही कोऱ्या चिठ्ठ्या आहेत त्या मी आपल्याला वाटणार आहे. पण त्या चिठ्ठ्या सर्वांनाच मिळतील असे नाहीं कारण आपल्याकडे वेळ कमी आहे. चिठ्ठी तुमच्या हातात मिळाल्यावर एका चिठ्ठीवर एक फळ व एक पदार्थ यांची नावे लिहा व चिठ्ठीची घडी घालून ज्या मुलाने चिठ्ठी आपल्या हातात दिली त्याच्याकडेच तुमच्या जवळच्या चिठ्ठ्या द्या. आपल्याला जी फळे व पदार्थ आवडत असतील त्यांचीं नावे लिहा व हे करीत असतांना फक्त दोनच मिनिटे शांतता ठेवा. एवढे केलेत तर मी आपली फारच चांगली करमणूक करणार आहे. व एक नवीन प्रयोग आपणास दाखविणार आहे. एवढे बोलून एका मुलास स्टेजवर येण्यास सांगावे.

### दृश्य

जादूगार आपल्या हातांतील कोऱ्या चिठ्ठ्या स्टेजवर आलेल्या मुलास देऊन समोरच बसलेल्या प्रेक्षकांस प्रत्येकी एक देण्यास सांगतो. जादूगाराने सांगितल्याप्रमाणें एका चिठ्ठीवर एक फळ व एक पदार्थ अशी दोन नांवे लिहून चिठ्ठीची घडी घालून ज्या मुलाने चिठ्ठी आपणास दिली त्याच्याकडे सर्व चिठ्ठ्या जमा करतात. त्या घेवून ठरल्याप्रमाणे मुलगा स्टेजवर येतो. जादूगार

आणखी दोन मुलांना स्टेजवर येण्याची विनंती करतो. ज्या मुलांच्या हातात सर्व चिठ्ठ्या असतात. त्यास आपल्या डाव्या हातास व नंतर आलेल्या दोन्ही मुलांना उजव्या हातास उभे राहाण्यास सांगून जादूगार मध्ये उभा राहून आपल्या हातातील बशीमध्यें सर्व चिठ्ठ्या टाकण्यास सांगतो उरलेल्या दोन मुलांपैकी एक मुलगा बशीतील एक चिठ्ठी उचलून घेतो. एवढ्यात जादूगार त्या दोन्ही मुलांना सांगतो तुम्ही दोघेही चिठ्ठी उघडून पहा. त्यामध्ये एखादे फळ व एक पदार्थ लिहिलेला असेल त्यापैकी तुम्ही दोघेही काय खाणार ते आपआसात ठरवून घ्या. हे न भांडता व कोणाच्याहि न कळत झाले पाहिजे. एवढे बोलून जादूगार आपल्या हातात एक खाऊचा डब्बा घेऊन त्याचे झांकण काढून स्टूलवर ठेवतो. व डब्बा ज्या मुलानें चिठ्ठ्या जमा करून आणल्या त्या मुलाच्या डोक्यावर ठेवून देतो व आपल्या हातात जादूची कांडी घेऊन त्या डब्यावरून गोल गोल फिरवून नंतर डब्बा रिकामा असल्याचे प्रेक्षकांस दाखवून परत डोक्यावर धरण्यास सांगतो. तोपर्यंत बाकीच्या दोन्ही मुलांनी चिठ्ठी उघडून कोणी काय खावयाचे हे नक्की केलेले असते. यावर जादूगार या मुलांना आपणापैकी कोणी काय खायाचे ठरविलेत ते आता मला सांगा. असे म्हणताच सफरचंद व चिवडा असा आवाज येतो. दोन्ही मुलांच्या पैकीं एक मुलगा मला चिवडा हवा. दुसरा मला सफरचंद हवा. यानंतर जादूगार एक रंगीत कागद व एक काडेपेटी हातात घेऊन ठीकतर. आता आपण या रिकाम्या डब्यातून चिवडा व सफरचंद निर्माण करू या.' असे बोलून काडी ओढून कागद पेटवून चटकन रिकाम्या डब्यात टाकून त्याच डब्याचे झांकण घालून डब्बा बंद करतो. व ज्या मुलाने चिवडा मागितलेला

असतो त्यास आपल्या जवळ बोलवून तुला चिवड्याचा वास येतो का पहा असे बोलून डब्याचे झांकण थोडेसे वर उचलून डब्बा मुलाचे नाकाजवळ नेतो तर मुलगा लगेच म्हणतो होय मला चिवड्याचा वास आला. आता या मुलास सफरचंदाचा वास येतो का पाहू असे बोलून जादूगार पहिल्याप्रमाणेंच डब्याचे झांकण थोडेसे वर उचलून दुस-या मुलाचे नाकाजवळ डब्बा नेतो. व पहिल्याप्रमाणेच दुसरा मुलगाहि आपल्याला सफरचंदचा वास येत असल्याचे सांगतो. आणि काय गंमत इथेच प्रेक्षकांचे लक्ष जादूगार या प्रयोगाकडे वेधून घेतो. व देवाला नैवेद्य दाखविला तरी देवाचे समाधान होते. मुले हो हो देवासारखीच असतात. मुलांनी चिवडा व सफरचंदचा वास घेतला. मुलांचेहि पोट भरले असेल असे बोलून जादूगार मुलांच्या तोंडाकडे बघतो तर मुले थोडीशी लाजलेली असतात. आणि प्रेक्षकांचे हास्याचे फवारे उडतात. तोच जादूगार सुरी हातात घेवून डब्याचे झांकण काढतो तर डब्यात चिवडा व सफरचंद काठोकाठ भरलेला असतो. प्रथम सफरचंद कापून त्याच्या लहान लहान फोडी करून अशा रीतींनें मुलांच्या तोंडांत एक एक फोड द्यावी की मुलाला लवकर खाताच येवू नये. नंतर दुसऱ्या मुलांस चिवडाही त्याच पद्धतीने द्यावा. डब्यातून मूठभरून चिवडा घेंतल्यासारखे करून मुलाच्या तोंडात चार दाने घालून बाकी मुठीतला चिवडा खाली सांडवाव असे बऱ्याच वेळा करावे म्हणजे खाली खूप चिवडा सांडलेला असेल. व एवढ्या लहानशा डब्यातून जादूगाराने कितीतरी चिवडा निर्माण केल्याचे पाहून प्रेक्षकांना आश्चर्य वाटेल.

या खेळासाठी लागणारा डबा खास तयार करून घ्यावा लागतो. डबा दिसण्यास उभट असावा. प्रथम या डब्याचे तीन

भाग तयार करावे, (अ) खालचा डबा (ब) मधला कप्पा (क) वरचे झाकण. शेजारील चित्रात दाखविल्याप्रमाणे तीन भाग तयार करून घ्यावे. मधला भाग हवा त्यावेळेस वरच्या झाकणात व हवा त्या वेळेस खालच्या डब्यात बसेल या मापाचा तयार




करावा. मधल्या डब्याच्या वरच्या तोंडास बाहेरच्या बाजूने एक लहानसा तारेचा टुकडा ठेवून त्यास डाग द्यावा. (क) व वरच्या झाकणाच्या तोंडाच्या कडेला एक आडवे छिद्र पाडावे म्हणजे (ब) मधल्या डब्याची तार (क) झाकणाच्या आडव्या छिद्रात अटकून मधला डबा वरच्या झाकणात चिकटून जाईल व उजव्या हाताच्या अंगठ्याने तारेला थोडासा दाब दिल्याबरोबर मधला डबा (अ) डब्यातच राहील व झाकणच तेवढे वर जाईल. अशा रीतीने डबा तयार झाल्यावर मधल्या कप्प्यात प्रथम चिवडा व त्यावर दोन सफरचंद ठेवून द्यावे. आणि मगच प्रयोगास सुरवात करावी. समजा डब्यामध्ये द्राक्ष आणि पेढे ठेवले असतील तर जादूगाराने स्वतःच तीन चिठ्ठ्या तयार कराव्या. प्रत्येकी चिठ्ठी-मध्ये द्राक्ष आणि पेढे असे लिहावे. त्या चिठ्ठ्यांच्या बारीक घड्या घालाव्यात व एक बशी डाव्या हातात घ्यावी. बशी डाव्या हातात धरताना बशीच्या तळाशी चार बोटे व आतील भागावर अंगठा ठेवावा. अंगठा व बशीच्या मधे स्वतःच तयार केलेल्या चिठ्ठ्या छपवून ठेवाव्यात. उजव्या हातात जादूची कांडी घ्यावी व मगच प्रेक्षकांनी लिहून दिलेल्या चिठ्ठ्या बशीत टाकण्यास सांगावे व त्याच चिठ्ठ्यामधून प्रयोगासाठी एक चिठ्ठी उचलून

घ्यावयाची असते. त्यावेळेस चिठ्ठी उचलणाऱ्या मुलास म्हणावे, तुला पाहिजे ती एक चिठ्ठी या बशीमधून उचल, चिठ्ठी उचलण्यास मुलाची दोन बोटे पुढे आल्याबरोबर अंगठ्याखालची आपणच लिहून ठेवलेली चिठ्ठी जादूगाराने उजव्या हातातील जादूच्या कांडीने अशा रीतीने पुढे सरकावयाची की मुलाच्या बोटात तीच चिठ्ठी आली पाहिजे. समजा दुसरीच चिठ्ठीस मुलाने उचलली तर तिसऱ्या मुलास परत एक चिठ्ठी उचलण्यास सांगावे व पुन्हा अंगठ्याखाली ठेवलेली चिठ्ठी देण्याचा प्रयत्न करावा. आपल्याला पाहिजे असलेली चिठ्ठी मुलाने उचलली म्हणजे पहिली चिठ्ठी बाद करून हीच चिठ्ठी उपयोगात आणावी. हा प्रयोग कसा होतो हे प्रत्येकाच्या करण्यावर अवलंबून आहे. आज तरी या प्रयोगाचे मुलांना फारच आकर्षण आहे. हा प्रयोग चांगल्याप्रकारे रंगविला तर अर्धा तास केव्हा निघून जातो हे कळतहि नाही. हा माझ्या स्वतःचा अनुभव आहे.

## जादूगाराची पोतडी

जादूगार हातात एक पोतडी घेऊन ही पोतडी रिकामी असल्याची प्रेक्षकांची खात्री करून देतो. व या रिकाम्या पोतडीतून मी आपणांस अनेक रुपये निर्माण करून दाखविणार आहे. यावर तुम्ही म्हणाल आम्हालाही अशी एक जादूची पोतडी द्या म्हणजे झाले. परंतु तशी इच्छा धराल तर फसाल कारण दुरून डोंगर साजरे असतात. आता आपल्यापैकी कोणीतरी मला एक रुपयाची दोन नाणी द्या. ही नाणी या पोतडीत टाकली म्हणजे त्यापासून अनेक रुपये निर्माण होतील एवढे बोलून झाल्यावर जादूगार आपल्या जवळची पोतडी उलट सुलट करून प्रेक्षकांना दाखवितो व पोतडी रिकामीच असल्याची प्रेक्षकांची खात्री झाल्यावर

त्यांचेकडून एक दोन (नाणी) रुपये घेवून पोतडीत टाकतो. व त्या पोतडीवरून जादूची कांडी तीन वेळा फिरवून झाल्यावर पोतडीचे तोंड उलटे करताच त्या मधून आठ दहा रुपये खाली पडतात. पहा या पोतडीत दोन रुपये टाकले होते. त्याचे आताचे आता दहा रुपये झाले. पण या पोतडीत जसा द्रव्य उत्पन्न करण्याचा गुण आहे तसाच तो नष्ट करण्याचाही दोष आहे. या पोतडीत तुम्ही कितीही रुपये टाका ते अदृश्य होतात.

## कृती

प्रथम शेजारील दाखविल्याप्रमाणें एक पिशवी तयार करावी. ही पिशवी कासडीची असते. या पिशवीमध्ये कांही खास कृत्रिम



रचना नसताना देखील दोन नाण्यांपासून अनेक नाणी उत्पन्न करता येतात. ही पिशवी तयार करण्यासाठी कोणतेही एखादे जाड कापड घ्यावे आणि नेहमीच्या रितीप्रमाणे त्याची एक पिशवी तयार करावी व तिच्या-खाली रुपाया राहील अशाच रुंदीची आतून दुसरी एक पट्टी जोडावी व या पट्टीची खालची बाजू मोकळीच ठेवावी. नंतर एक रुपाया राहील असे तिला आठ दहा कप्पे मध्यें शिवण घालून तयार करून घ्यावे. मग त्या प्रत्येक कप्प्यात प्रत्येकी एक रुपया (नाणे) घालून पट्टीच्या पुढील तोंडास पिशवीचे एक अंग आत घालून बळकटसा व सुळसुळीत धावता दोरा घालावा. या धावत्या दोऱ्याचे एक टोक पिशवीचे बाहेर आणून त्याला चांगली गाठ मारावी. आणि दोऱ्याचे दुसरे टोक पिशवीच्या दुसऱ्या टोकाशी आपोआप न तुटेल अशा रितीने

ठेवावे म्हणजे ही जादूगाराची पोतडी तयार झाली. एवढे करून झाल्यावर बेधडक प्रयोगास सुरवात करावी.

## जादूगार सैनिक

आज मी आपणाला तीन सैनिकांची गोष्ट सांगणार आहे. एकदा एका लढाईमधील तीन सैनिक चुकून शत्रुच्या गावांत शिरले. हे रुमाल म्हणजे आपण तीन सैनिक समजू (जादूगार खास रुमाल, साधा रुमाल व छोटा रुमाल दाखवितो.) त्यांनी कितीहि वेषांतर केले तरी शत्रूने त्यांना ओळखले व पोलीस त्यांना पकडायला धावले. तेव्हा हे तिघेही पळाले. पण हा छोटा सैनिक पोलिसांना सापडला. त्यांनी त्याला पकडले व तुरुंगात घातले. अर्थात खरोखरचा तुरुंग मला येथें आणता येणार नाही. म्हणून आपण (जादूगार बोलतां बोलतां भेळीचा पुडा करतो.) हा पुडा म्हणजे तुरुंग समजू. अर्थात पुडा नीट झाला नाही. पण जरा आपण नीट करण्याचा प्रयत्न करू या. (जादूगार खास काठी आत घालतो व थोड्या वेळांत मोकळे नळकांडे बाहेर काढतो. आ. ब. पहा.) आपण हा छोटा सैनिक आत ठेऊन देऊ. (जादूगार छोटा रुमाल भेळीच्या पुड्यांत काठीवर ठेवून देतो व पुडा प्रेक्षकांना दाखवितो. रुमालामुळे काठी प्रेक्षकांना दिसत नाही.) ह्या सैनिकाला आपण अगदी तळांत ठेवू या. (असे म्हणून जादूगार मोकळे नळकांडे रुमालावर ठेवून ते दाबतो. त्यामुळे रुमाल नळकांड्यांत जातो.) आता हा तुरुंग व कैदी आपण टेबलावर ठेवूया. (जादूगार खास काठी काढून, पुडा बंद करतो व टेबलावर ठेवतो.)

आता आपण उरलेल्या दोन सैनिकांकडे वळू. ते दोघे गुपचूप

एका खोलीत दडले. ( कृतींत वर्णन केल्याप्रमाणे रुमालाचीं गाठ मारावी.) ते तिघेही जादूगार होते. त्यांनी एकमेकाचं स्मरण करताच तिघे एकत्र आले. चला माझ्या हाताकडे पहा. एक, दोन तीन...वा ! वा ! ! वा ! ! ! हे पहा तिघे एकत्र आले. ( जादूगार रुमाल झटकतो. आ. ४ पहा ).

सकाळ होताच पोलिसांनी तुरुंग उघडून पाहिले तो काय ? कैदी पसार.

**दृश्य** :—जादूगार तीन रुमाल प्रेक्षकांना दाखवितो. त्यापैकी दोन रुमालांच्या गाठी मारून ते रुमाल एका पेल्यामध्ये ठेऊन देतो. एका वर्तमानपत्राचा भेळीचा पुडा करून, तो तिसरा रुमाल आत ठेवून देतो व जादूच्या काठीने तो रुमाल तळांत दडपतो. एक, दोन, तीन म्हणताच भेळीच्या पुड्यातील रुमाल गुप्त होऊन दूर अंतरावरील दोन रुमालांच्यामध्यें गाठी मारून जाऊन बसतो.

साहित्य व तयारी:– ह्या प्रयोगासाठी एक खास जादूचा रुमाल दोन साधे रुमाल, वर्तनमान पत्र व खास जादूची कांडी लागते.

**खास जादूचा रुमाल करण्याची कृतिः**–एका साध्या रुमालाच्या, मागे त्या रुमालाच्या रंगाचाच कापडाचा तुकडा वापरून एका छोटीशी पिशवी करावी. ( आ. पहा ). त्या पिशवीत एक छोटासा रंगीत रुमाल ठेवन द्यावा. त्या रुमालाचे एक टोक पिशवीच्या आत शिवावे व दुसरे टोक मोकळे



ठेवावे रुमाल अशा तऱ्हेने ठेऊन द्यावा की त्याच्या मोकळ्या टोकाचा थोडासा भाग पिशवी बाहेर राहील.

**खास जादूची कांडी करण्याची कृती:**–एक पोकळ नळकांडे घ्यावे.




याच्या दोन्ही बाजूला टोपणे बसवावीत. त्यापेकी एका टोपणाच्या आतील बाजूला एक काठी किंवा लोखंडीं नळी बसवावी. (आ. ब पहा). ते टोपण लवताच नळकांडे जादूच्या कांडी प्रमाणें दिसू लागेल. (आ. अ. पहा). नळकांडे चांगले रंगवावे.

**कृति** :–जादूगार तीन रुमाल घेतो. एक खास रुमाल, दुसरा खास रुमालाच्या आत असणाऱ्या रुमालाप्रमाणेंच असणारा रुमाल व तिसरा म्हणजे कोणताहि साधा रुमाल.

जादूगार प्रथम एक वर्तमानपत्र घेतो व त्याचा भेळीचा पुडा करतो. तो नीट करण्यासाठी म्हणून तो खास जादूची कांडी आत घालतो व त्यावेळी ज्या टोपणाला कांडी जोडलेली असते ते टोक तो खाली ठेवतो.

एका हाताने टोपण घट्ट धरून दुसऱ्या हाताने कांडीं अलगत उचलताच पोकळ नळकांडे बाहेर येते व कांडी आतच रहाते. [ आ ब पहा ].




नंतर जादूगार खास रुमाल व साध्या रुमालाची गाठ मारतो. त्यावेळी खरोखर तो खास रुमालाच्या आतील छोटचा रुमालाचे टोक व साधा रुमाल ह्यांची गाठ मारतो. पण प्रेक्षकांना खास रुमाल व साधा रुमाल ह्यांचीच गाठ मारली आहे असा भास

होतो. नंतर जादूगार ते दोन रुमाल एका रिकाम्या पेल्यांत ठेऊन देतो.

त्यानंतर जादूगार छोटा रुमाल घेतो व तो भेळीच्या पुड्यांत कांडीच्या टोकावर ठेवतो व भेळीचा पुडा प्रेक्षकांना दाखवितो. रुमालामुळे काठी लपली जाते व प्रेक्षकांना फक्त रुमालच दिसतो. (आ. ब पहा) नंतर जादूगार तो रुमाल तळांत घालविण्याचे मिषानें पोकळ नळकाडे रुमालावर ठेवून ते नळकांडे आत दाबतो. त्यामुळे टोपण बसले जाऊन रुमाल नळकांड्यांत जातो. जेव्हां जादूगार काठी (म्हणजे नळकांडे) बाहेर काढतो तेव्हां आतला रुमाल कोणालाच दिसत नाहीं. नंतर जादूगार तो पुडा टेबलावर ठेवतो.

नंतर जादूगार ग्लास मधील रुमाल झटकतो. तेव्हां भेळीच्या



पुड्यातील रुमाल दोन रुमालांच्या मध्यभागी दिसतो. खरा तो रुमाल आधीच दडविलेला रुमाल असतो. प्रेक्षक भेळीच्या पुड्यात रुमाल आहे ! असे सांगताच तो पुडा उलगाडावा व वर्तमानमत्र तपासायला देऊन पुढील प्रयोगाला लागावे. (भेळीचा पुडा एकदम उलगडतो व प्रेक्षकांच्या हातात देतो.)

**कांही महत्त्वाचे** मुद्दे :–वरील प्रयोगात काही लक्षात ठेवण्याजोग्या गोष्टी आहेत.

(१) खास रुमाल व साधा रुमाल यांची गाठ मारतांना छोटा रुमाल जास्त बाहेर काढू नये. नाहीतर प्रयोगाचे गुपित फुटेल गाठ मारताना स्वस्थ उभे न रहाता फेऱ्या माराव्यात.

(२) छोटा रुमाल भेळीच्या पुड्यांत ठेवताना घडी करून ठेवावा. म्हणजे त्याचा आकार कमी होतो व तो पोकळ नळकांड्यांत सहज मावतो. शिवाय तो रुमाल काठीच्या मध्यभागी ठेवावा. नाहीतर तो खाली पडेल व मोकळ्या नळकांड्यांत येणार नाही.

(३) दोन रुमालात तिसरा रुमाल दाखविताना रुमाल झटकावे. जर एकदम ओढले तर छोटा रुमाल तुटून पिशवी बाहेर येईल

(४) जादूची खास कांडी म्हणजे रुमाल शोषणारी काठी नीट उपयोगात आणावी. ज्यावेळी ती भेळीच्या पुड्यात घालतो तेव्हां आतील काडीच्या विरुद्ध बाजूचे टोपण हातात घ्यावे. जेव्हां आपण रुमाल आंत येण्यासाठी पुन्हा वापरतो तेव्हा तिचे मोकळें तोंड कोणत्या दिशेला आहे त्याचा विचार करावा. घाईत दुसरे टोक घालू नये.

(५) रुमाल शोषणारी काठी हळूवारपणे वापरावी. ती एकदम जोरात हलवल्यास कदाचित् आतील काठी टोपणासकट बाहेर येण्याचा संभव असतो.

## जिभेतून दाभण आरपार घालणे

### संभाषण

सभ्य स्त्रीपुरुष हो कधी चालताना सहज आपल्या पायात लहानसा काटा जरी टोचला तर त्याच्या वेदना किती असह्य होत असतात याची कल्पना आपणास आहेच. आता मी हा माझ्याजवळ असलेला दाभण जिभेतून आरपार घालून दाखविणार आहे. हा

प्रयोग दिसण्यास थोडासा भयावह असा आहे तरी घाबरून जाण्याचे काही कारण नाही. हा प्रयोग करण्याची आता मला चांगली सवय झाली आहे. एवढे बोलून झाल्यावर प्रयोगास सुरूवात करावी.

### दृश्य

जादूगार आपल्या हातातील दाभण सर्व प्रेक्षकांस दाखवन तो नेहमी प्रमाणेच असल्याची खात्री पटवून देतो. नंतर दोनतीन वेळा दाभण जिभे जवळ नेवून तो जिभेस टोचण्याचा प्रयत्न करतो व लगेच दाभण जिभेतून आरपार घालवून दाखवितो. यावेळेस त्याला बोलता वगैरे येत नाही तर तो हातानेच हातवारे करून सांगितल्या प्रमाणे दाभण जिभेतून आरपार घातला असे भासवत असतो. एवढे करून झाल्यावर चटकन दाभण जिभेतून काढून घेतो.

### कृती

हाही प्रयोग करण्यास अतिशय सोपा असाच आहे. प्रथम मूळ दाभणाप्रमाणेच एक कृत्रिम दाभण तयार करावा लागतो. तो



शेजारील चित्रात दाखविल्या प्रमाणेच करावा. कृत्रीम दाभणाचा मधला आकडा वजा जाता त्याची लांबी मूळ दाभणा इतकीच ठेवावी व ह्या प्रयोगा-साठी तयार केलेला कृत्रीम दाभण शेवटपर्यंत कोणाच्याहि दृष्टीस पडू देवू नये. प्रयोगास सुरवात करताना प्रथम मूळ दाभण हातात घ्यावा. व तोच सर्व प्रेक्षकास दाखवावा. नतंर उगीचच इकडचे सामान तिकडे, तिकडचे सामान इकडे, बाहेरचे सामान पोतडीत, पोतडीतले सामान बाहेर असे करता करता

पोतडीत ठेवलेला कृत्रीम दाभण हातात घ्यावा व मूळ दाभण पोतडीत टाकावा. हा कृत्रीम दाभणाचा मधला भाग हाताच्या मुठीत धरल्यावर त्याचा मधला आकडा प्रेक्षकास दिसत नाही. मग दोनतीन वेळा दाभणाचे टोक जिभेच्या खालच्या बाजूने टोचण्याचा प्रयत्न करावा व चौथ्यांदा मान थोडीशी खाली वाकवून दाभणाचा मधला आकडा चटकन जिभेत गुंतवून ओठ दाभणास चिकटवावे म्हणजे आकडा संपूर्ण तोंडातच झाकला जाईल. आणि दाभणाचा खालचा व वरचा भाग जिभेतून आरपार गेल्याचे दिसेल. परत दाभण जिभेतून काढताना प्रथम मान थोडीशी खाली वाकवावी व आकडा हातात धरून दाभण खाली ओढून काढल्या सारखे करावे. अशा तऱ्हेने मानेतून सूरा आरपार घालवून दाखविणे, पोटातून तलवार आरपार घालवून दाखविणे वगैरे प्रयोग गारुडी रस्त्यांतून करीत असल्याचे आपण पाहिले असेल. त्यांनी या प्रयोगाची चांगली सवय करून घेतलेली असते आपणहि या प्रयोगाची प्रथम घरात सवय करून घेणे.

# अदृश्य होणारी पावली

## प्रास्ताविक भाषण

सर्व साधारण जादूचे प्रयोग म्हटले की रुपयाचे खडे करणे खड्याचे रुपये करणे, हातावर रुपया नाचविणे वगैरे प्रयोग चटकन आपल्या नजरेसमोर येतात. परंतु हे प्रयोग जादूगार स्वतःच करून दाखवित असतो. आता मी समोर जो प्रयोग करून दाखविणार आहे. तो आपणापैकीच कोणाकडून तरी करून घेणार आहे. मला जे जे म्हणून जादूचे प्रयोग येतात त्यापैकी एकही प्रयोग असा नाही की तो मीच करतो व आपल्यापैकी कोणासहि येणार

नाही, हे मी नुसतेच बोलतो अशातला भाग नाही तर प्रत्यक्ष आपण या प्रयोगास सुरूवात करू या. असे बोलून प्रयोगास सुरूवात करावी.

## दृश्य

प्रेक्षकांतूनच कोणा एकाला उजवा हात पुढे करण्यास सांगून ज.दूगार आपल्या जवळची पावली त्याच्या हातावर ठवून पाठोपाठ एक पैसाही त्या हातावर ठेवतो आणि लगेच पैसा परत आपल्या हाताने काढून घेतो. मी पैसा काढून घेतला पण पावली आपल्या हातातच आहे तेव्हां कृपा करून आपली मूठ घट्ट आवळून धरावी म्हणजे पावलीला कोठेही पळून जाता येणार नाही, असे बोलून जादूगार आपली जादूची कांडी त्या मुठीवरून फिरवितो व मूठ उघडण्यास सांगतो तर काय चमत्कार हातामधील पावली नाहीशी झालेली असते.

## कृती



या प्रयोगासाठी फक्त एक पावली व एक पैसा लागतो. शेजारील चित्रात दाखविल्या प्रमाणे पैश्याच्या पाठीला पावलीच्या मापाचा एक खाचा काढून घ्यावा. हा खाचा काढण्यासाठी पावली पेक्षा थोडासा आकाराने मोठा पैसा असतो तोच उपयोगास आणावा, पैश्याचा तोंडाचा भाग तसाच कायम ठेवावा व पावली पैश्याच्या खाच्यात बसवल्या नंतर पैश्याची मूळ जाडी जराही वाढणार नाही अशा बेतानेच खाचा घ्यावा आणि पावलीच्या पाठ भागास संपूर्ण तांब्याचे पाणी देवून घ्यावे हे काम कोणताहि सोनार करून देइल मात्र हे करीत असताना पावलीचा मूळ तोंड

भाग जसाच्या तसाच राहून द्यावा. अशा रीतीने पावली व पैसा तयार करून झाल्यावर पावलीचा तोंड भाग पैशाच्या खाच्यात ठेवल्यावर दोन्ही बाजूनी पैसाच तेवढा दिसेल व पावली पैशात



एकरूप झालेली असेल. या नंतर पुढील पद्धतीने प्रयोगास सुरवात करावी. प्रथम पावलीचा मूळ तोंड भागच फक्त पहाणाऱ्यांना दिसेल व पावलीचा पाठ भाग जराही दिसणार नाही. अशा रीतीने पावली कोणा एकाच्या हातावर ठेवावी. नंतर शेजारील चित्रात दाखविल्या प्रमाणे पावलीच्या अर्ध्या भागावर पैसा ठेवावा व तो अशा रीतीने की पैशाचा फक्त तोंड भागच प्रेक्षकांना दिसेल म्हणजे पैशाला खाचा असलेली बाजू पावलीवर पडलेली असेल व पैशाच्या तोंड भागावर जादूगाराने आपला डाव्या हाताचा अंगठा ठेवून प्रेक्षकास मूठ बंद करण्यास सांगावी. प्रेक्षक मूठ बंद करीत असतानाच अंगठ्याने पैसा पावलीवर सरकवावा. व लगेच तसाच काढून घ्यावा आणि प्रेक्षकास मूठ बंदच ठेवण्यास सांगावे. मात्र पैसा मुठीतून काढल्याबरोबर प्रेक्षकास दोन्ही बाजूंनी दाखवावा. पैशाच्या खाच्यात अडकून आलेली पावली प्रेक्षकांस मुळीच दिसत नाही. कारण पावलीच्या पाठ भागास तांब्याचे पाणी दिलेलें असते. एवढे करून झाल्यावर जादूची कांडी टेबलावरून उचलावी. ही कांडी उचलीत असतानाच हातातील पैसा टेबलावर ठेवावा. हे अगदी बेमालूम करावे व हातात नुसतीच जादूची कांडी घेवून प्रेक्षकाच्या मुठीवरून एक दोन वेळा फिरवावी व नंतर मूठ उघडण्यास सांगावे. आपल्याच

हातातील पावली नाहीशी झाल्याचे पाहून त्या प्रेक्षकाला फारच गंमत वाटेल व हाच प्रयोग पुन्हां करून दाखवा असा आग्रह इतर प्रेक्षक करतील तरी आपण मुळीच करू नये. कारण एकाच जागेवर तोच प्रयोग दोन वेळा करून दाखविल्याने त्याचे महत्त्व कमी होते.

## तीन पत्त्यापैकी मनातला पत्ता ओळखणे

जादूगाराने हातात पत्त्याचा डाव घेऊन पिसता पिसताच थोडक्यांत पुढील प्रास्ताविक भाषण करावे. जादूगार आणि पत्ते यांचा संबंध अतिशय निकटचा असतोच. पण पत्त्याचा डाव हा प्रत्येक माणसाच्या हातातून कधीतरी येवून गेलेला असतो याची कारणे वेगवेगळी असतात पण सर्वसाधारण माणूस पत्त्याच्या डावाचा उपयोग स्वतःची करमणूक करून घेण्यासाठी करतो व मी आपली सर्वांची करमणूक करणार आहे एवढाच फरक. परंतु सर्वसाधारण लोकांची कल्पना अशी असते की जादूगाराजवळचे डाव हे निरनिराळ्या प्रयोगासाठी खास तयार करून ठेवलेले असतात तसे माझ्याकडेही आहेत पण हा डाव अगदी साधा असाच आहे. या डावातून आपल्याला पाहिजे असतील ती तीन पाने काढून घ्या त्यातील कोणतेही एक पान मनात ठेवा व परत तीन्ही पाने माझ्याकडे द्या आपण मनांत ठेवलेले पान मी अचूक सांगणार आहे.

### दृश्य

जादूगार कोणा एका प्रेक्षकाला बोलावून आपल्या जवळचा डाव त्याच्या हातात देवून यांतील कोणतेही तीन पत्ते काढून घ्या व डाव प्रथम माझ्याकडे द्या असे बोलून प्रेक्षकांचे तीन पत्ते घेवून झाल्यावर डाव आपल्या हातात घेतो. नंतर प्रेक्षकाकडे तीन पत्ते उरलेले असतात त्यातील एक पत्ता मनात ठेवून तीनही पत्ते

प्रेक्षक जादूगाराजवळ देतो. जादूगार ते तिन्ही पत्ते आपल्या कोटाच्या खिशात ठेवून देतो आणि त्यातील प्रथम एक पान बाहेर काढून डाव्या हातातील पत्त्याच्या डावात ठेवतो. त्याच प्रमाणे दुसरेही पान काढून डावात ठेवतो व नंतर प्रेक्षकास उद्देशून आपण कोणते पान मनात ठेवले होते त्याचे कृपा करून नांव सांगा आणि काय चमत्कार प्रेक्षक ज्या पत्त्याचे नांव सांगतात तोच तिसरा पत्ता जादूगाराचे खिशात उरलेला असतो जादूगार आपल्या खिशातून पत्ता काढून दाखवितो तेव्हा प्रेक्षक एकदम चाट पडतात.

### कृती

या प्रयोगाची पूर्व तयारी म्हणून जादूगाराने डावांतील कोणतेही तीन पत्ते प्रथम स्वतःच्या खिशात घालून ठेवावे, अर्थातच हे कोणाच्याही न कळत करावे नंतर यांतील कोणतेही तीन पत्ते आपण काढून घ्या असे बोलून जादूगाराने डाव प्रेक्षकांच्या हातात द्यावा. व प्रेक्षकाने तीन पत्ते काढून घेताच प्रथम डाव आपल्या डाव्या हातात घेवून ठेवावा आणि प्रेक्षकांस सांगावे आता आपल्या हातात जे तीन पत्ते आहेत त्यातील कोणतेही एक पान आपण मनात ठेवा व तिन्ही पत्ते माझ्याकडे द्या. असे बोलून जादूगारानें हे तिन्ही पत्ते आपल्या हातात घेवून ते क्रमानें लावून घ्यावेत समजा या तिन्ही पानांत एक अठ्ठा, दुसरा पंजा व तिसरा गुलाम आहे तर प्रथम गुलाम त्याच्या खाली नं. २ अठ्ठा व त्याच्याही खाली नं. ३ पंजा ठेवून हे तिन्ही पत्ते सर्व प्रथम दोन पत्ते ठेवलेले असतात त्याच खिशात दोन पत्त्यांच्या वर हे तिन्ही ठेवणे. एवढे करून झाल्यावर प्रथम जे दोन पत्ते खिशांत ठेवलेले असतात त्यातील एक पान काढून हे पान तुमचे आहे का ? नाही असे बोलून ते

डाव्या हातातील डावात ठेवून द्यावे नंतर दुसरेही पान काढून घेवून हे पान तुमचे आहे का ? असे बोलून तेही पान डावात ठेवून द्यावें. व प्रेक्षकांस म्हणावे आता कृपया तुम्ही मनांत ठेवलेले पान कोणते ते सांगा ? समजा प्रेक्षकाने गुलाम असे म्हटले तर जादूगारानें आपल्या खिशातील वरचेच पान काढून द्यावे समजा अठ्ठा असे म्हटले तर नं. २ चे पान काढून द्यावे शेंवटपर्यंत तिन्ही पानें जादूगाराच्या खिशातच असल्यानें कोणत्याही पानाचे नांव प्रेंक्षकाने सांगितले तरी जादूगारास ते सहज काढून देता येते हा प्रयोग लागोपाठ दोन तीन वेळा केला तरी लवकर कोणाच्या लक्षांत येत नाही.

## नाचणाऱ्या बाहुल्या

संभाषणः- आपण अनेक प्रकारची नृत्ये पाहिलेली आहेत. पण मी आपल्या समोर जे नृत्य सादर करणार आहे. ते आपण क्वचितच पाहिले असेल. आणि हे नृत्य पाहताना आपल्याला एक वेगळाच आनंद मिळणार आहे. कारण एखादी निर्जीव वस्तू वाऱ्याच्या झुळकेसरशी इकडची तिकडे सरकली तरी आपण बावचळल्या सारखे होतो. तीच अवस्था हे नृत्य पाहताना होते. असे बोलून जादूगार आपल्या खिशातून दोन बाहुल्या काढून प्रयोगास सुरवात करतो.

### दृश्य

जादूगार आपल्या जवळच्या बाहुल्या टेबलावर ठेवून त्यांच्या डोक्यावरून तीन वेळा जादूची कांडी फिरवतो. येवढयात दोन्ही बाहुल्या हालचाल करायला लागतात. आणि जादूगार त्यांना एका तालावर नाचविण्याचा प्रयत्न करतो. तः तः तः ढींग तः

मुरली मनोहर कृष्ण कन्हैया जमूनाके तटपर राधा नाचे राधाके पायल बाज रहे थें मोहन उसपर कहेने लगा तिंग धिकीना धिकीना तिंग धिकीना ऽऽऽ जादूगाराच्या बोलण्या बरोबरच बाहुल्याही जोरजोरात नाचत असतात. मध्येच जादूची कांडी त्यांच्या डोक्यावर फिरविल्यास बाहुल्या एक शब्दही न बोलता स्तब्ध उभ्या राहातात. परत जादूची कांडी फिरवली की पुन्हा जोरजोरात नाचतात.

### कृती

हा प्रयोग करायला अतिशय सोपा आहे. प्रथम दोन प्लॅस्टिकच्या तीन इंच उंची असलेल्या बाहुल्या घेवून शेजारील चित्रात



दाखविल्या प्रमाणे दोन्ही बाहुल्यांच्या गळ्यात मानेतून आरपार निघेल असे आर्धा सूत जाडीचे एक छिद्र पाडावे. नंतर एक अणू जाडीची तीन फूट लांब अशी तार घ्यावी ही तार प्रत्यक्षात हातात घेवून पाहिल्याशिवाय दिसणारच नाही एवढी पातळ असावी. कदाचित अशी तार मिळाली नाही तर घोड्याच्या शेपटीचा एक केस उपयोगात आणावा. पण तार आसल्यास उत्तम. बाहुल्यांच्या मानेला पाडलेल्या छिद्रातून तार आरपार काढावी व बाहुल्या तारेच्या मध्यभागी ठेवून दोन्हीं टोकाला प्रत्येकी चिंचोक्या एवढे मेण चिकटवावे एवढें केले म्हणजे प्रयोगाची पूर्व तयारी झाली, आतां प्रत्यक्ष प्रयोगास सुरूवात करतेवेळी जादूच्या प्रयोगास आवश्यक असे साहित्य टेबलावर ठेवलेले असते त्याच

टेबलावर थोडीशी जागा करून दोन्हीं बाहुल्या ठेवून देणे. व तारेच्या दोन्ही टोकाला मेण असते त्यापैकी एका टोकाचे मेण कोणत्याही एखाद्या साहित्यास ( डब्यास ) चिकटविणे व दुसऱ्या टोकाचे मेण जादूगाराने आपल्याच डाव्या हाताचे अंगठ्या शेजारील बोटाचे नखास चिकटविणे व उजवा हात जादूची कांडी फिरविण्यास नेहमीच रिकामा असू द्यावा. एवढे करून झाल्यावर मेण चिकटविलेले बोट हळू लागताच बाहुल्याहि नाचू लागतील आणि बोट हलविणे थांबले म्हणजे बाहुल्याहि स्तब्ध राहतील. या प्रयोगाची सुरवात केल्यावर कितीहि वेळ तो करता येतो. पहाणाराला गंमत वाटते आणि प्रयोग करायला ही गंमत वाटते. याच पद्धतीचे प्रयोग गारुडी चौका चौकातून करतात आणि चहुकडून प्रेक्षक उभे असूनहि या प्रयोगाचे बिंग लवकर फुटत नाही.

## ग्लासातील पत्ता नाहीसा करणे

### संभाषण

हातात पत्याचा डाव घेवून पिसता पिसताच जादूगाराने पुढील संभाषण करावे, जादूचे प्रयोग म्हटले की एखादा रिकामा डबा प्रेक्षकांना दाखवून दुसऱ्या क्षणात तो भरलेला दाखविणें अथवा भरलेला दाखवून क्षणात तोच डबा रिकामा दाखविणे. जेणे करून प्रेक्षक आश्चर्य चकीत होतील असे काहीतरी करून दाखविणे यालाच आपण जादूचे प्रयोग म्हणतो. यातलाच हा एक प्रयोग मी आपल्या समोर करून दाखविणार आहे.

### दृश्य

जादूगार एक रिकामा काचेचा ग्लास घेवून सर्वासमक्ष त्या

ग्लासात थोडेसे पाणी ओतून तो ग्लास जवळच्या स्टूलावर ठेवतो आणि पत्त्याचा डाव हातात घेवून त्याच डावातील एक पत्ता पहाणाऱ्या एखाद्या व्यक्तीकडून त्या ग्लासमध्ये ठेवून घेतो व ग्लास रूमालाने झाकून त्यावरून जादूची कांडी फिरवून होताच रुमाल उचलून घेतो तर ग्लासमधील पत्ता नाहीसा झालेला असतो.

## कृति

या प्रयोगास सुरवात करण्यापूर्वी डावातील कोणतेहि एक पान घेवून त्या पानाची लांबीं रुंदी एवढाच एक प्लॅस्टीकचा तुकडा कापून तयार करणे. प्रथमता तुकडा टेबलावर ठेवणे. नंतर सर्वां· समक्ष एक ग्लास घेवून त्यांत थोडेसे पाणी टाकावे आणि ग्लास टेबलावर ठेवावा. नंतर पत्त्याचा डाव हातात घेवून पिसता पिस· ताच एखाद्या प्रेक्षकास स्टेजवर येण्याची विनंती करावी. प्रेक्षक स्टेजजवळ येताच आपल्या हातातला डाव टेबलावर ठेवलेल्या प्लॅस्टीकच्या तुकड्यावर ठेवावा आणि स्टेजवर आलेल्या प्रेक्षकाची चांगली ओळख करून घ्यावी व टेबलावर ठेवलेला डाव प्लॅस्टी· कच्या तुकड्यासह उचलावा व दुसऱ्या हाताने एक मोठा रुमाल घेऊन हातातील डावावर टाकावा व तसाच डाव ग्लासच्या तोंडा· वर धरून डावातील पहिले पान ( प्लास्टीकचा तुकडा ) रुमा· लाच्या वरूनच ग्लासमध्ये सोडण्यास प्रेक्षकास सांगावे. हे पान ग्लासामध्यें सोडल्याचे खात्री करून घ्यावी व रुमाल तसाच ग्लासवर झाकून डाव टेबलावर ठेवावा. नंतर डाव्या हाताने ग्लास उचलून घ्यावा. उजव्या हाताने जादूची कांडी ग्लास वरून फिरवावी व चटकन रुमाल काढून घ्यावा. ग्लासमधील पान नाहीसे झालेले असेल कारण प्लॅस्टीकचा तुकडा ग्लास मधे

असूनही प्रेक्षकांना दिसून येत नाही. प्लॅस्टीकचा तुकडा डावातील पाना एवढाच पातळ असल्यास ग्लासमधे सोडताना प्रेक्षकांस शंका येत नाही व हा एक तुकडा जवळ असल्यास कोठेंहि प्रयोग करता येणे सहज शक्य असते.

## ग्लास अदृष्य करणे

### दृश्य

या प्रयोगाच्या सुरवातीस ज्या टेबलावर जादूचे साहित्य ठेवलेले असते त्याच टेबलाच्या समोर जादूगार उभा असतो व त्याच्या डाव्या आणि उजव्या हाताला दोन स्टूल ठेवलेले असतात उजव्या हाताच्या स्टुलावर एक लहानशी पेटी ठेवलेली असते. जादूगार टेबलावरचा एक काचेचा ग्लास घेवून स्टुलावर ठेवलेल्या पेटीवर ठेवून देतो. व एक रुमाल घेवून ग्लासावर ठेवून देतो व हे प्रयोग साधण्यासाठीं मुद्दामच जवळ बाळगलेली जादूची कांडी तीन वेळा ग्लासावरून फिरवून टेबलावर ठेवून देतो व उजव्या हाताने रुमालासह ग्लास उचलून घेतो येवढयात जादूगाराचा साथीदार एक थाळी घेवून येतो त्या थाळीवर जादूगार ग्लास ठेवण्यास जातो. एवढयात ग्लास नाहीसा झालेला असतो. थाळी मोकळीच असते आणि हातात नुसताच रुमाल असतो. हा चमत्कार पाहून बुद्धिमान मनुष्याची कल्पना गुंग होवून जाते.

### कृति

या प्रयोगाची पूर्व तयारी म्हणजे ग्लासावर झांकण घालण्याठीं जो रुमाल उपयोगात आणायचा त्याच्या मध्यभागी ग्लासाच्या तोंडाच्या आकाराएवढीच एक काचेची बांगडी शिवून घ्यावी लागते. शेजारील चित्रात दाखविल्याप्रमाणे बांगडी रुमालात शिवून घ्यावी. प्रथम हात रुमालापेक्षा दीडपट रुंदीचा मोठा असा



फुलांचा छाप असलेला एक रुमाल तयार करावा. त्या रुमालाच्या मध्यभागी एक साधी काचेची बांगडी ठेवावी आणि ही बांगडी कोणालाहि दिसू नये म्हणून बांगडी पेक्षा आकाराने थोडासा रुंद असा एक कपड्याचा तुकडा बांगडीवर ठेवावा. व चारी बाजूंनी शिवून घ्यावा. हा कपड्याचा तुकडा मूळ रुमालात एकरूप होईल असाच घ्यावा. आता या प्रयोगासाठीं लागणारा रुमाल तयार झाला. या नंतर स्टुलवर ठेवण्यासाठीं एक पेटी लागते. त्या पेटीच्या वरच्या भागाला मध्यभागी ग्लासच्या तोंडाच्या आकारापेक्षा किंचीत मोठें छिद्र पाडावे. अशा रितीने पेटी व रुमाल तयार केल्यावर प्रयोगास पुढील पद्धतीने सुरूवात करावी. प्रथम ग्लास घेवून तो अगदी साधाच असल्याचे सर्वांचे निदर्शनास आणावें. व ग्लास डावे हाताचे स्टुलावर ठेवावा. नंतर छिद्र पाडलेली पेटी उजवे हाताचे स्टुलवर ठेवावी व उगीचच एकादी अद्‌भूत चमत्काराने भरलेली गोष्ट प्रेक्षकांस सांगावी. ही गोष्ट प्रसंगास साजेल अशीच सांगावी. नंतर ग्लास उचलून पेटीवर मुद्दाम पाडलेल्या छिद्रा शेजारी ठेवावा. व या प्रयोगासाठें खास तयार केलेला रुमाल घेवून ग्लासच्या तोंडावर बांगडी बसेल असा ठेवून रुमालाचे चारी कोपरे खाली लोंबते सोडावेत. म्हणजे



ग्लास संपूर्ण झांकून जाईल. नंतर शेजारील चित्रात दाखविल्या प्रमाणे बांगडीसह ग्लास उचलण्याचा भास निर्माण करून ग्लास शेजारील छिद्रात सोडून द्यावा. बांगडीची रुंदी व ग्लासाची रुंदी सारखीच असल्याने ग्लास पेटीत पडल्याचे पहाणाऱ्याचे लक्षात येत नाही. एवढ्यात टेबलामागून आपल्याच साथीदाराने एक थाळी घेवून यावे व जादूगाराने हातातील ग्लास थाळीत ठेवण्यास जावे. थाळीच्या मध्यभागी रुमाल नेवून रुमालाला एक झटका मारावा. थाळी मोकळी व रुमालही मोकळा रुमाल प्रेक्षकांना दाखविताना दोन्हीं हातात दोन कोपरे धरावेत व दोन कोपरे खाली लोंबते सोडावेत म्हणजे रुमालातील बांगडी दिसून येणार नाहीं. हा प्रयोग करते वेळेस कोणतेहि संभाषण न करता एखादे वाद्य वादन चालू ठेवावे. व रुमाल थाळीत झटकते वेळेस उखळीत आवाजाची दारु भरून तिचा उपयोग करावा म्हणजे या प्रयोगास अधिक भारदस्तपणा निर्माण होतो.

## नाडी पाहून पत्ते ओळखणे

### संभाषण

ज्योतिषी हात पाहून माणसाचा भविष्यकाळ सांगतात. डॉक्टर आपल्या हाताची नाडी पाहून रोगाचे निदान करतात. मी नाडी पाहून पत्ते ओळखणार आहे. आपण आपली करमणूक करून घेण्याच्या हेतूनेच जादूचे प्रयोग पहाण्यास आले आहात व आपली सर्वांची करमणूक करण्याची संधी मलाहि पाहिजे आहे. तेव्हां समोर बसलेल्या दोन तरुणांनी कृपया स्टेजवर यावे म्हणजे मला प्रयोग करणे सुलभ होईल.

### दृश्य

जादूगाराच्या उजव्या व डाव्या हाताला एक स्टूल ठेवलेला असतो. त्यावर वेगवेगळे दोन पत्त्याचे डाव ठेवलेले असतात व जादूगारास मदत करण्याचे उद्देशाने स्टेजवर आलेले दोन तरुणापैकी एक तरुण एका डावातून कोणतेही एक पान काढून घेतो. त्याच प्रमाणे दुसरा तरुणही दुसऱ्या डावातून एक पान काढून घेतो अशा रितीने दोन्ही पाने घेऊन झाल्यावर जादूगार थोडे पुढे होऊन आपल्याला हवी असलेली दोन पाने आपण घेतलीत पण त्या पानांचा नंबर लक्षात ठेऊव ती पानें खिशात ठेवा. नंतर मी तुमच्या हाताची नाडी पाहून पान ओळखण्याचा प्रयत्न करणार आहे. जादूगार नाडी पहाण्यास सुरवात करून तुम्ही तुमच्या मनातला पत्ता बदलायचा नाही. जो पत्ता तुमच्या जवळ आहे तो मनातच घोकायचा. मला वाटते तुमच्या जवळ असलेला पत्ता म्हणजे एक चित्र आहे आणि त्याचा रंग लालसर आहे तेव्हां बहुतेक बदामची राणी असावी असे नाडीच्या ठोक्यावरून तरी वाटते. बघू तर काय आहे ते? बदामराणीच ठीक आहे. नंतर दुसऱ्या तरुणाकडे वळून त्याचे हाताची नाडी पहात असतानाच तुमच्या जवळचा पत्ता बदलू नका. जो पत्ता तुमच्या जवळ आहे तोच सारखा मनात घोका. तुमच्या जवळचे पान किलावरची पंजी आहे. बघू तर काय आहे? नंतर ही दोन्ही पाने व्यवस्थित सर्व प्रेक्षकांना दाखवून जादूगार स्टेजवर आलेल्या तरुणांचे आभार मानतो व हा प्रयोग संपल्याचे जाहीर करतो.

### कृती

या प्रयोगास लागणारे पत्त्यांचे डाव हे खास तयार करून घेतलेले असतात किंवा हे डाव बाजारात विकतही मिळतात. या

डावात असलेली बावन्न पाने ही एकाच प्रकारची असतात. या डावातून कोणतेही पान घेतले तरी ते किलावरची पंजीच असणार हे उघड. अशा प्रकारचे आपल्याला सोईस्कर असे दोन डाव प्रथम विकत घ्यावेत. त्याच वेळेस साधे डावही घ्यावेत. कारण प्रत्येक डावाच्या पृष्ठ भागावरची नक्षी वेगवेगळी असते. आणि या प्रयोगाला तर एकाच नक्षीचे डाव लागतात. ते मिळाले तर हे पत्यांचे प्रयोग करणे फारच सुलभ होते. समजा एका डावातील बावन्न पत्ते हे सर्व एकाच प्रकारचे एक्के आहेत. मग त्यातून कोणतेही एक पान घेतले तर तो एक्काच असणार. फरक एवढाच आपण तो नाडी पाहून सांगायचा.

## नाडीचे ठोके बंद करणे

### दृश्य

जादूगार प्रेक्षकांपैकी ज्यांना नाडीचे ठोके मोजतां येतात अशा माणसांना बोलावितो. नंतर तो साथीदाराला खुर्चीवर बसवितो. नंतर तो साथीदाराला त्याचा उजवा हात समोर लांब करायला सांगतो. प्रेक्षकद्वय त्याची नाडी तपासतात. जादूगार प्रेक्षकांना विचारतो. "नाडी लागतीय ?" प्रेक्षक "होय" म्हणून उत्तर देतात. नंतर जादूगार हळू हळू आपल्या साथीदाराला डोळे मिटायला सांगतो. नंतर तो सर्व प्रेक्षकांना सांगतो, "मी आतां माझ्या साथीदाराची नाडी बंद करून दाखवितो." नंतर जादूगार साथीदाराच्या दंडापासून तळहातापर्यंत हलके हलके हात फिरवितो. पुन्हां तीच क्रिया ३-४ वेळां केल्यानंतर प्रेक्षक नाडी बघतात. तेव्हां ठोके कमी झालेले असतात. पुन्हां जादूगार ३-४ वेळा आपला हात साथीदाराच्या दंडापासून तळहातापर्यंत फिरवितो

प्रेक्षक पुन्हां नाडी बघतात तेव्हां ती अधिक मंद झालेली असते. पुन्हां त्यानें हात फिरविताच नाडी पूर्णपणे बंद पडते.

नंतर जादूगार आपला हात पूर्वी फिरविलेल्या दिशेच्या उलट दिशेने म्हणजे तळहातापासून दंडापर्यंत फिरवितो. प्रेक्षक पुन्हां नाडी बघतात. तेव्हां ती मंद लागते. तीच क्रिया ४-६ वेळा करताच ती अधिक जलद चालूं लागते. पुन्हां चार पाच वेळा हात फिरविताच नाडी नेहमी प्रमाणे लागते.

**कृती**

एक लाकडी गोळा घेऊन त्या गोळ्याला भोक पाडून त्यातून दोरी ओवून घ्यावी.

ज्या हाताची नाडी बंद करावयाची असेल त्या हाताच्या काखेमध्यें तो गोळा ठेवून दोरीने तो घट्ट बांधावा.

" आज मी आपल्याला एक हिप्नॉटिझमचा प्रयोग दाखविणार आहे. आपल्यापैकी ज्यांना नाडी ओळखता येते असे दोघेजण मला पाहिजेत. " ( प्रेक्षकांपैकी दोघेजण आल्यावर जादूगार साथीदाराला खुर्चीत बसवितो व त्याच्या ज्या हाताच्या काखेंत गोळा असतो तो हात पुढे करावयाला सांगतो. नंतर प्रेक्षक येऊन नाडी तपासतात. )

" आता मी जसजसा हात फिरवित जाईन तसतशी नाडी मंद होत जाईल. "

असे म्हटल्या नंतर जेव्हा जादूगार हात फिरवितो तेव्हा साथीदारानेच हलकेच आपला दंड गोळ्यावर दाबावा. म्हणजे नाडी मंद होते. जेव्हा तो पूर्णपणे दंड दाबतो तेव्हा गोळ्याच्या दाबामुळे रक्त प्रवाह थांबतो व नाडी बंद होते. नंतर जसजसा

जादूगार हात उलटा फिरवित असताना हळू हळू दंड सैल सोडावा म्हणजे पुन्हा नाडी सुरू होते. लाकडी गोळ्याच्या दाबानेए का शुद्ध रक्तवाहिनीचे कार्य तात्पुरते थांबते.

यांत घाबरण्याजोगे कांहीं नाही. संवयीने हा प्रयो चांगला जमतो.

## जपानी आगपेटी

### दृश्य

जादूगार एक आगपेटी घेवून येतो व तिच्या वरील छाप दाखवितो. जादूगार टिचकी मारताच आगपेटीच्या वरील छाप मागच्या बाजूला येतो. पुन्हां टिचकी मारताच तो पहिल्या जागी येतो.

### कृती

काडेपेटी अंगठा व अंगठ्या शेजारील बोट (first finger) ह्यांच्या मध्ये धरावी. (चित्र पहा) नंतर चटकन बोट व अंगठा फिरवावेत म्हणजे बोट अंगठ्याच्या जागी व अंगठा बोटाच्या जागी येतो.



## पत्त्यांची चलाखी

### दृश्य

जादूगार एक वर्तमानपत्र झटकन् रिकामे असल्याचे दाखवितो. नंतर तो चार कोपऱ्यांत चार पत्ते ठेवून देतो. नंतर तो दोन पुस्तके घेतो व दोन पत्ते झाकतो. पुन्हा ती पुस्तके उचलून दुसऱ्या दोन पत्त्यांवर ठेवून देतो व उरलेली दोन पत्ते



दाखवितो. ह्या दोन पत्त्यांपैकी एक पत्ता जादूगार उचलून वर्तमान पत्राखालून एका पुस्तकाजवळ नेतो. व खालून टिचकी मारताच तो पत्ता वर्तमानपत्रातून आरपार वर येतो व पुस्तकाखाली थांबतो. जादूगार ते पूस्तक उचलून खालील दोन पत्ते दाखवितो नंतर तो उरलेला पत्ता तसाच खालून वर आणून दाखवितो. उरलेला तिसरा पत्ता दुसऱ्या पुस्तकाखाली असतो. तो पुस्तकावर थाप मारताच कागदातून आरपार जातो. जादूगार तो पत्ता वर्तमानपत्राखालून ज्या पुस्तकाखाली ३ पत्तें असतात त्याच्या खाली आणतो. टिचकी मारताच तो पत्ता वर येतो. जादूगार पुस्तक उचलून चारही पत्तें दाखवितो. पुस्तके पेपर रिकामे दाखवितो.

## कृती

हा प्रयोग अतिशय महत्त्वाचा आहे व कृति नीट चार पाच वेळा वाचावी.

जादूगार प्रथम वर्तमानपत्रावर चार पत्तें ठेवतो व दोन पत्तें पुस्तकानी झाकतो. उरले दोन नंतर पुन्हां जेव्हां पुस्तके बदलतो तेव्हां तो एक पुस्तक आहे त्याच जागी ठेवतो. तिसऱ्या वेळी पुस्तके ठेवतानां तो जे पुस्तक उचलले नसते, त्याच्या खालील पत्ता व ते एकदम उचलतो पण दुसऱ्या पत्त्यावर ठेवतो. व त्यामुळें त्या पुस्तकाखाली दोन पत्ते येतात. जीं रिकामी जागा रहाते त्याच्यावर तो चटकन दुसरे पुस्तक ठेवतो. ही हालचाल चटकन करावयाला पाहिजे ह्यामुळें प्रेक्षकांना असे दिसते की दोन पत्ते झाकलेले आहेत व दोन पत्तें उघडे आहेत. पण प्रत्यक्षात एका पुस्तकाखाली दोन पत्ते असतात व दुसऱ्या पुस्तका खाली काहीच नसते.

नंतर जादूगार उघड्या पत्त्यांपैकी एक पत्ता घेतो व कागदाखालून नेऊन दाखवितो त्यावेळी उजव्या हातात पत्ता असतो व डावा हात मोकळा असतो. डाव्या हातानें पेपर असा धरावा कीं चार बोटे वर राहतील व अंगठा पेपराखाली ( म्हणजे वर्तमानपत्राखाली ) येईल. ( आकृती अ पहा दुसऱ्या खेपेला पत्ता नेताना तो पत्ता अंगठा व वर्तमान पत्र ह्यामध्ये दाबून धरावा. तो पत्ता प्रेक्षकांना दिसत नाही. नंतर मोकळा हात, ज्या पुस्तकाखाली दोन पत्ते आहेत, त्या पुस्तकाखाली नेऊन टिचकी मारावी व ते पुस्तक उचलून खालील दोन पत्त दाखवावेत. म्हणजे प्रेक्षकांना खालील पत्तावर आलेला आहे असे वाटेल. दोन पत्ते दाखविताना जेव्हां जादूगार उजव्या हाताने पुस्तक उचलतो तेव्हां ते झटकन डाव्या हातातील पत्त्यावर आणून चटकन तो पत्ता उजव्या हाताने पुस्तकाखाली घेतो. प्रेक्षकांना दोन पत्ते दाखवितांना ३–४ सेकंदाचा अवधि द्यावा व तेवढ्यांत डाव्या हातांतील पत्ता उजव्या हातातील पुस्तकाखाली घ्यावा. जेव्हां जादूगार ते पुस्तक दोन पत्त्यावर टाकतो, तेव्हां त्या पुस्तकाखाली तीन पत्ते असतात. पुन्हा जादूगार दुसरा पत्ता घेतो व पूर्वीप्रमाणे पुस्तकाखाली आणतो. तिसरा पत्ता वर्तमान पत्राखाली टिचकी मारून घालवायचा असतो. हा भाग अगदी सोपा आहे. त्या पुस्तकाखाली पत्ताच नसतो.

---

# कोर्स नंबर १

**प्रवेश फी १ रुपया व संपूर्ण कोर्सची फी ३० रुपये**

पुढे दिलेले प्रयोग शिकवून त्यास लागणारे साहित्य मोफत दिले जाते हा कोर्स फक्त एक दिवसांत शिकविला जातो.

**( १ ) दोन रुमालात तिसरा रुमाल**

दोन रुमालांच्या गाठी मारून ठेवले असता तिसरा रुमाल दोन्ही रुमालांच्यामध्ये जावून बसतो.

**( २ ) प्रेक्षकांच्या नाकातोंडातून पैसे काढणे.**

जादूगार प्रेक्षकांच्या नाकातोंडातून पैसेच पैसे काढून सारे थिएटर हास्याने दणाणून सोडतो.

**( ३ ) शाईपासून फुले निर्माण करणे**

जादूगाराने प्रेक्षकांच्या अंगावर शाई फेकल्यास फुले पडतात.

**( ४ ) रुमालांच्या गाठी मारून सोडणे**

दोन रुमालांच्या गाठी मारून ठेवले असता क्षणार्धात रुमाल वेगवेगळे होतात.

**( ५ ) कागद फाडून पुन्हा निर्माण करणे**

कागदाचे तुकडे केले असता पुन्हा जसाच्यातसाच कागद तयार होतो.

**( ६ ) बाहुल्यांचा नाच**

दोन बाहुल्या टेबलावर ठेवून जादूची कांडी फिरविताच नाचू लागतात.

**( ७ ) रुमालांचा पाऊस**

या एका रुमालापासून अनेक रुमाल निर्माण करता येतात.

**(८) हातावर रुपयाचो धावपळ**

हा रुपया हातावर ठेवताच सारखा धावपळ करू लागतो.

**(९) पहाता पहाता रुमालाचे अंडे तयार करणे**

हा रुमाल हातात घेताच त्याचे अंड्यामध्ये रूपांतर होते.

**(१०) दूर अंतरावर संदेश पोहचविणे.**

जादूगार व प्रेक्षक यांच्यात घडलेल्या घटना दूर अंतरावरून आलेला साथीदार अचूक सांगेल.

# काही खास प्रयोग

**ग्लास अदृश्य करणे.** किमत रु. १०

हातावर एक फळीचा तुकडा घेवून त्यावर ग्लास ठेवताच नाहीसा होतो.

**डोक्यावर भात शिजविणे** किमत रु. १०

एका लहान भांड्यात थोडेसे तांदूळ घालून ते भांडे कोणत्याही मुलाचे डोक्यावर ठेवतांच भात शिजलेला दिसेल.

**चिमणीचा आवाज** किमत रु. १०

हा प्रयोग म्हणजे एक प्रकारचे संगीतच आहे. जिथे हात लावाल तिथून चिव, चिव असा आवाज निर्माण होईल.

**अत्तराचा वास देणे** किमत रु. १०

प्रेक्षक मनामध्ये ज्या अत्तराचे नांव घेतील. त्याच अत्तराचा वास त्यांना येईल.

**डोक्यावर सुरे खोचणे** किमत रु. १०

जादूगार आपल्या साथीदाराचे डोक्यात चार सुरे खोचन ठवतो.

**फुक्यास** किमत रु. १५

एका भांड्यात पाणी घालून पालथे ठेवले असता त्यामधील पाणी नाहीसे होवून दुसऱ्या भांड्यात निघते व दुसरे भांडे पालथे घातले असता पुन्हां तीच क्रिया होते.

**पाण्यापासून तांदूळ निर्माण करणे.** किमत रु. १५

या भांड्यात पाणी ठेवले असता क्षणार्धात तांदूळ तयार होतात.

**डॉय बॉक्स** किमत रु. १५

लहान पण सुंदर लाकडी पेटींत ठेवलेला चौकोणी गोळा नाहीसा होवून दुसरीकडे आढळतो.

**पाण्यात पत्ते ओळखणे** किमत रु. १५

डावातील कोणतेही तीन पानें प्रेक्षकांनी घेतली असता मुलगी पाण्यात पाहून तिन्ही पाने बरोबर ओळखते.

**हातावर जाळ लावणे.** किमत रु. १०

रॉकेलचा बोळा पेटवून त्यावर हात ठेवणे.

वरील दहा प्रयोग आत्मसात केल्यावर हेच प्रयोग लहान मोठ्या हायस्कूल कॉलेजमध्ये करून आपल्या कांही प्रांताचा अथवा सबंध भारत खंडाचा प्रवास करता येतो. प्रवास करून मार्मिक क्षेत्रे व ऐतिहासिक स्थळें पहाण्याची हौस व आवड असणारे, प्रवासासाठी लागणारा खर्च हे प्रयोग करून मिळवू शकतात. हा माझा स्वतःचा अनुभव आहे.

या पुस्तकात लिहिलेल्या प्रयोगासबंधी कांहीं अडचणी असल्यास अथवा एखादा प्रयोग दोन तीन वेळा वाचूनहि जर समजला नाहीं तर आपण मला जरूर लिहावे. पत्र रूपानें मी तो प्रयोग समजावून देण्याचा प्रयत्न करीन.

जादूची किमया आवृत्ति २ किमत ६५ पैसे. पोष्ट खर्चासिह ८० पैसे. या छोट्याशा पुस्तकांत आश्चर्य कारक (२५) प्रयोगांची आकृतीसह सविस्तर माहिती दिली आहे.

व्ही. पी. ची पद्धत नाहीं. पुस्तका सबंधी पत्र व्यवहार सौ. मुक्ता चंद्रसेन कुटे, दापोडी पोष्टासमोर, पुणें क्र. १२, या नांवे करावा.

---

